|| श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराज प्रसन्न ||

# || श्री संत ज्ञानेश्वर महाराज संपुर्ण हरिपाठ ||

भजन - रामकृष्ण हरि | जय जय रामकृष्ण हरि

सुंदर ते ध्यान उभे विटेवरी वरी | कर कटावरी ठेवूनियां ||१|| तुळसीहार गळां कांसे पितांबर | आवडे निरंतर हेंचि ध्यान ||२|| मकर कुंडलें तळपती श्रवणी | कंठी कौस्तुभमणि विराजित ||३|| तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख | पाहीन श्रीमुख आवडींने ||४||

१. देवाचिये द्वारीं उभा क्षणभरीं | तेणें मुक्तिचारी साधियेल्या ||१|| हरि मुखें म्हणा हरि मुखे म्हणा | पुण्याची गणना कोण करी ||२|| असोनि संसारी जिव्हे वेगु करी | वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ||३|| ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणा | व्दारकेचा राणा पांडवा घरीं ||४||



२. चहूं वेदीं जाण साही शास्त्रींकारण । अठराही पुराणें हरिसी गाती ।।१।। मंथुनी नवनीतां तैसें घे अनंता । वायां व्यर्थ कथा सांडी मार्गु ।।२।। एक हरि आत्मा जीवशिवसम । वायां तूं दुर्गमा न घाली मन।।३।। ज्ञानदेवा पाठ हरि हा वैकुंठ। भरला घनदाट हरि दिसे ।।४।।

३. त्रिगुण आसार निर्गुण हे सार । सारासार विचार हरिपाठ ।।१।। सगुण निर्गुण गुणाचे अगुण । हरिवीण मन व्यर्थ जाय ।।२।। अव्यक्त निराकार नाही ज्या आकार । जेथोनि चराचर हरिसी भजे ।।३।। ज्ञानदेवा ध्यानी रामकृष्ण मनीं । अनंत जन्मोनि पुण्य होय ।।४।।

४. भावेंवीण भक्ती भक्तीवीण मुक्ती । बळेंविण शक्ती बोलूं नये ।।१।। कैसेनि दैवत प्रसन्न त्वरीत । उगा राहें निवांत शिणसी वायां ।।२।। सायांस करिसी प्रपंच दिननिशीं । हरिसी न भजसी



कोण्या गुणें ||३|| ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें | तुटेंल धरणें प्रपंचाचें ||४||

५. योगयोग विधी येणें नव्हे सिध्दी | वायांचि उपाधि दंभ धर्म ||१|| भावेंवीण देव न कळें निःसंदेह | गुरूवीण अनुभव कैसा कळे ||२|| तपेंवीण दैवत दिधल्यावीण प्राप्त | गुजेंवीण हित कोण सांगे ||३|| ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात | साधूंचे संगति तरणोपाय||४||

६. साधुबोध झाला तो नुरानियां ठेला | ठायींच मुराला अनुभवे ||१|| कापुंराची वाती उजळली ज्योति | ठायींच समाप्ती झाली जैसी ||२|| मोक्षरेखे आला भाग्यें विनटला | साधूंचा अंकिला हरिभक्त ||३|| ज्ञानदेवा गोडी संगति सज्जनीं | हरि दिसे जनींवनीं आत्मतत्वीं ||४||

७.पर्वताप्रमाणे पातक करणे | वज्रलेप होणें अभक्तांसी ||१|| नाहीं ज्यासी भक्ती तो पतित



अभक्त । हरिसी न भजत दैवहत ।।२।। अनंत वाचाळ बरळती बरळ । त्यां कैसेनि गोपाळ पावे हरि ।।३।। ज्ञानदेव प्रमाण आत्मा हा निधान । सर्वांघटीं पूर्ण एक नांदे ।।४।।

८.संतांचे संगती मनोमार्ग गति । आकळावा श्रीपती येणें पंथे ।।१।। रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा । आत्मा जो शिवाचा राम जप ।।२।। एकतत्व नाम साधिती साधन । व्दैताचे बंधन न बांधिजे ।।३।। नामामृत गोडी वैष्णवां लाधली । योगियां साधली जीवनकळा ।।४।। सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला । उध्दवा लाधला कृष्णदाता ।।५।। ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ।।६।।

९.विष्णुविण जप व्यर्थ त्याचें ज्ञान । रामकृष्णीं मन नाहीं ज्याचे ।।१।। उपजोनि करंटा नेणे अव्दैत वाटा । रामकृष्णीं पैठा कैसेनि होय ।।२।।



व्दैताची झाडणी गुरूवीण ज्ञान । तया कैचें कीर्तन घडे नामीं ।।३।। ज्ञानदेव म्हणे सगुण हे ध्यान । नामपाठ मौन प्रपंचाचे ।।४।।

भजन-रामकृष्णहरि जय जय रामकृष्णहरि।।

१०. त्रिवेणी संगमी नाना तीर्थे भ्रमी । चित्त नाहीं नामीं तरी तें व्यर्थ ।।१।। नामासि विन्मुख तो नर पापिया । हरिवीण धांवया न पवे कोणी ।।२।। पुराणप्रसिध्द बोलिले वाल्मिक । नामें तिन्ही लोक उध्दरती ।।३।। ज्ञानदेव म्हणे नाम जपा हरीचें । परंपरा त्याचें कुळ शुध्द ।।४।।

११.हरि उच्चारणी अनंत पापराशी । जातील लयाशी क्षणमात्रें ।।१।। तृण अग्निमेळें समरस झालें । तैसें नामें केले जपतां हरि ।।२।। हरि उच्चारण मंत्र हा अगाध । पळे भूतबाधा भेणें तेथे ।।३।। ज्ञानदेव म्हणे हरि माझा समर्थ । न करवे अर्थ उपनिषदां ।।४।।



१२. तीर्थव्रत नेम भावेंवीण सिध्दी । वायांचि उपाधि करिसी जना ।।१।। भावबळे आकळे येऱ्हवी नाकळे । करतळीं आवळे तैसा हरि ।।२।। पारियाचा रवा घेतां भूमीवरी । यत्न परोपरी साधन तैसें ।।३।। ज्ञानदेव म्हणे निवृत्ति निर्गुण । दिधले संपूर्ण माझ्या हातीं ।।४।।

१३. समाधी हरिची समसुखेंवीण । न साधेल जाण व्दैतबुध्दी ।।१।। बुध्दीचे वैभव अन्य नाहीं दुजे । एका केशवराजे सकळ सिध्दी ।।२।। ऋध्दिसिध्दिनिधी अवधीच उपाधि । जव त्या परमानंदी मन नाहीं ।।३।। ज्ञानदेवी रम्य रमलें समाधान । हरिचें चिंतन सर्वकाळ ।।४।।

१४. नित्य सत्यमित हरिपाठ ज्यासी। कळिकाळ त्यासी न पाहे दृष्टी ।।१।। रामकृष्ण उच्चार अनंतराशी तप । पापाचे कळप पळती पुढें ।।२।। हरि हरि हरि मंत्र हा शिवाचा । म्हणति जे वाचा









तयां मोक्ष ।।३।। ज्ञानदेवा पाठ नारायण नाम । पाविजे उत्तम निजस्थान ।।४।।

१५. एक नाम हरि व्दैतनाम दुरी । अव्दैतकुसरी विरळा जाणे ।।१।। समबुध्दी घेता समान श्रीहरी । शमदमा वरी हरि झाला ।।२।। सर्वांघटीं राम देहादेहीं एक । सूर्य प्रकाशक सहस्त्ररश्मीं ।।३।। ज्ञानदेवा चित्ती हरिपाठ नेमा । मागिलिया जन्मा मुक्त झालो ।।४।।

१६. हरि बुध्दि जपे तो नर दुर्लभ । वाचेसि सुलभ रामकृष्ण ।।१।। रामकृष्णनामीं उन्मनी साधिली । तयासीलाधली सकळ सिध्दी ।।२।। सिध्दि बुध्दि धर्म हरिपाठी आले । प्रपंची निवाले साधुसंगे ।।३।। ज्ञानदेवी नाम रामकृष्ण ठसा । याणे दशदिशा आत्माराम ।।४।।

१७. हरिपाठ कीर्ति मुखे जरी गाय । पवित्रचि होय देह त्याचा ।।१।। तपाचे सामर्थ्ये तपिन्नला



अमूप । चिरंजीव कल्प वैकुंठीं नांदे ।।२।। मातृ पितृ भ्राता सगोत्र अपार । चतुर्भज नर होऊनि ठेले ।।३।। ज्ञान गूढ गम्य ज्ञानदेवा लाधले । निवृत्तीने दिले माझ्या हातीं ।।४।।

१८. हरिवंशपुराण हरिनामसंकीर्तन । हरिवीण सौजन्य नेणे कांहीं ।।१।। तया नरा लाधलें वैकुंठ जोडलें । सकळही घडले तीर्थाटन ।।२।। मनोमार्गे गेला तो येथे मुकला । हरिपाठीं स्थिरावला तोचि धन्य ।।३।। ज्ञानदेवा गोडी हरिनामाची जोडी । रामकृष्णीं आवडी सर्वकाळ ।।४।।

भजन- जय विठोबा रखुमाई ।जयजय विठोबा रखुमाई ।।

१९. नामसंकीर्तन वैष्णवांची जोडी । पापे अनंत कोडी गेली त्यांची ।।२।।अनंत जन्मांचे तप एक नाम । सर्वमार्ग सुगम हरिपाठ ।।२।। योगायोग क्रिया धर्माधर्म माया । गेले ते विलया हरिपाठी







।।३।। ज्ञानदेवीं यज्ञ याग क्रिया धर्म ।हरिवीण नेम नाही दुजा ।।४।।

२०. वेदशास्त्रप्रमाण श्रुतीचे वचन। एक नारायण सार जाप ।।१।। जप तप कर्म हरिविण धर्म । वाउगाचि श्रम व्यर्थ जाय ।।२।। हरिपाठी गेले ते निवांतचि ठेले । भ्रमर गुंतले सुमनकळिके ।।३।। ज्ञानदेवीं मंत्र हरिनामाचे शस्त्र । यमे कुळगोत्र वर्जियेले ।।४।।

२१.काळवेळ नाम उच्चारिंता नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उध्दरती ।।१।। रामकृष्णनाम सर्व दोषांहरण । जडजीवां तारंण हरि एक ।।२।। हरिनाम सार जिव्हा या नामाची । उपमा त्या दैवाची कोण वानी ।।३।। ज्ञानदेवा सांग झाला हरिपाठ । पूर्वजा वैकुंठ मार्ग सोपा ।।४।।

२२.नित्यनेम नामी ते प्राणी दुर्लभ । लक्ष्मीवल्लभ तया जवळी ।।१।। नारायण हरि नारायण हरि ।



भुक्ती मुक्ती चारी घरी त्यांच्या ।।२।। हरिवीण जन्म तो नर्कचि पै जाणा । यमाचा पाहुणा प्राणी होय ।।३।। ज्ञानदेव पुसे निवृत्तीसी चाड । गगनाहुनि वाड नाम आहे ।।४।।

२३. सात पांच तीन दशकांचा मेळा । एकतत्त्वीं कळा दावी हरि ।।१।। तैसे नव्हें नाम सर्व मार्गा वरिष्ठ । येथे कांही कष्ट न लगती ।।२।। अजपा जपणें उलट प्राणाचा । तेथेंही मनाचा निर्धारू असे ।।३।। ज्ञानदेवां जिणें नामेवीण व्यर्थ । रामकृष्णीं पंथ क्रमीयेला।।४।।

२४.जप तप कर्म क्रिया नेम धर्म । सर्वांघटीं राम भावशुध्द ।।१।। न सोडी रे भावो टाकी रे संदेहो । रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ।।२।। जात वित्त गोत कुळ शिळ मात । भजे का त्वरीत भावनायुक्त ।।३।। ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण मनीं । वैकुंठभुवनी घर केलें ।।४।।









२५.जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं । हरि उच्चारणीं पाही मोक्ष सदा ।।१।। नारायण हरि उच्चार नामाचा । तेथें कळिकाळाचा रीघ नाही ।।२।। तेथील प्रमाण नेणवे वेदांसी । ते जीवजंतूसी केंवि कळे ।।३।। ज्ञानदेव फळ नारायण पाठ। सर्वत्र वैकुंठ केले असे।।४।।

२६. एकतत्व नाम दृढ धरीं मना । हरिसी करूणा येईल तुझी ।।१।। ते नाम सोपे रें रामकृष्ण गोविंद । वाचेसी सद्गद जपे आधी ।।२।। नामापरतें तत्व नाही रे अन्यथा । वायां आणिका पंथा जासी झणी ।।३।। ज्ञानदेवा मौन जप माळ अंतरी । धरोनी श्रीहरि जपे सदा ।।४।।

२७.सर्व सुख गोडी साहिशास्त्रे निवडी । रिकामा अर्धघडी राहूं नको ।।१।। लटिका व्यवहार सर्व हा संसार । वाया येरझार हरिवीण ।।२।। नाम मंत्र जप कोटि जाईल पाप । कृष्णनामीं संकल्प



धरूनि राहें ।।३।। निजवृत्ती काढी सर्व माया तोडी । इंद्रियां सवडी लपो नको ।।४।। तीर्थव्रतीं भाव धरी रे करूणा । शांतीदया पाहुणा हरि करी ।।५।। ज्ञानदेवा प्रमाण निवृत्तिदेवी ज्ञान । समाधि संजीवन हरिपाठ ।।६।।

।। पुंडलिक वरदा हरि विठ्ठल श्री ज्ञानदेव तुकाराम ।।

२८. नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरें ।।१।। न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ।।२।। ठायींच बैसोनी करा एकचित । आवडी अनंत आळवावा ।।३।। रामकृष्णहरि विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ।।४।। याविण आणिक असतां साधन । वाहातसें आण विठोबाची ।।५।। तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि । शाहणा तो धेतो येथें ।।६।।









२९. देवाचिये व्दारी उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ।।१।। हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणाची गणना कोण करी ।।धृ.।। असोनि संसारी जिव्हे वेंग करीं। वेदशास्त्र उभारी बाह्यासदा ।।३।। ज्ञानदेव म्हणे व्यासाचिया खुणा । व्दारकेचा राणा पांडवा घरीं ।।४।।

।। भजन-जय जय विठ्ठोबा रखुमाई ।।

## गुरूपरंपरेचे अभंग

३०.सत्यगुरूरायें कृपा मज केली । परी नाहीं घडली सेवा कांहीं ।।१।। सांपडविलें वाटें जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ।।धृ.।। भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नामाजीं ।।३।। काय कळें उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा झाली ।।४।। राघव चैतन्य केशव चैतन्य । सांगितली खूण मालिकेची ।।५।। बाबाजी आपुलें सांगितलें



नाम । मंत्र दिला रामकृष्णहरि ।।६।। माहो शुध्द दशमी पाहूनि गुरूवार । केला अंगीकार तुका म्हणे ।।७।।

३१. माझियें मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरूराव ।। १।। आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेंणें नोहे गुंफा कांहीं कोठें ।।धृ।। जाती पुढें एक उतरले पार। हा भवसागर साधुसंत ।।३।। जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी ताफे पेटे ।।४।। तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ।।५।।

३२. घालुनियां भार राहिलो निश्चींती । निरविलें संतीं विठोबासी ।।१।। लावूनियां हात कुरूवाळिला माथा । सांगितले चिंता न कराव ।।धृ।। कटीं कर समचरण साजिरें । राहीला भीवरे तीरीं उभा ।।३।। खुंटले सायास आणिक या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ।।४।। तुज









वाटें आतां ते करीं अनंता । तुका म्हणे संता लाज माझी ।।५।।

३३. माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव। आपणचि देव होय गुरू ।।१।। पढिये देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ।।धृ।। मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावें ।।३।। योगक्षेम त्यांचें जाणे जडभारी । वाट दावी करीं धरूनियां ।।४।। तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणी विचारुनि ।।५।।

३४. आदिनाथ उमा बिज प्रगटिलें । मच्छिंद्रा लाधलें सहजस्थीतीं ।।१।। तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली । पुर्ण कृपा केली गहिनीनाथा ।।धृ।। वैराग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ।।३।। निर्व्दंव्द निःशंक विचरतां मही । सुखानंद ह्रदयीं स्थिरावला ।।४।। विरक्तीचें



पात्र अन्वयाचें मुख । देऊनि सम्यक अनन्यता ।।५।। निवृत्ती गहिनी कृपा केली पुर्ण । कुळ हें पावन कृष्णनामें ।।६।।

३५. आदिनाथ गुरू सकळ सिध्दांचा । मच्छिंद्र तयाचा मुख्य शिष्य ।।१।। मच्छिंद्रानें बोध गोरक्षासी केला । गोरक्ष वोळला गहिनीप्रतिं ।।धृ।। गहिनीप्रसादें निवृत्ति दातार । ज्ञानदेवा सार चोजविलें ।।३।।

३६. अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचे आतां । चरणी जगन्नाथा चित्त ठेलें ।।१।। माय जगन्नाथ बाप जगन्नाथ । अनाथाचा नाथ जनार्दन ।।धृ।। एका जनार्दनीं एकपणें उभा । चैतन्याची शोभा शोभतसे ।।३।।

३७. अवघाची संसार सुखचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ।।१।। जाईन गे माय तया पंढरपूरा । भेटेन माहेरा आपुलीया ।।धृ।। सर्व









सुकृताचे फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगा ।।३।। बापरखुमादेवीवरू विठ्ठलेंसी भेटी । आपुले संवसाटीं करूनि ठेला ।।४।।

३८. श्रीगुरूसारिखा असतां पाठीराखा । इतरांचा लेखा कोण करी ।।धृ।। राजयाची कांता काय भिक मागे । मनाचिया जोगे सिध्दि पावे ।।२।। कल्पतरू तळवटीं जो कोणी बैसला । काय वाणी त्याला सांगाजो जी ।।३।। ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों । आतां उध्दरलों गुरूकृपे ।।४।। ज्ञानेश्वर माऊली।ज्ञानराज माऊली तुकाराम।।

## विनंतीचे अभंग

३९. कृपाळु सज्जन तुम्हीं संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ।।१।। आठवण तुम्ही द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुलती ।।धृ।। अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायां वेगळा नका करूं ।।३।। तुका म्हणे तुम्हीं निरविल्यावरी ।



मग मज हरि उपेक्षीना ||४||

भजन- विठ्ठल जय जय विठ्ठल

४०.बोलिलीं लेंकुरें । वेडीं वाकुडीं उत्तरें ||१|| करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिध्द ||धृ|| नाही विचारिला । अधिकार म्यां आपुला ||३|| तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ||४|| भजन:-ज्ञानदेव तुकाराम । ज्ञानदेव तुकाराम ||

४१. झालें समाधान । तुमचे धरिले चरण ||१|| आता उठावेंसें मना । येत नाही नारायणा ||२|| सुरवाडिकपणें । येथे सांपडलें केणें ||३|| तुका म्हणे भोग । गेला निवारला लाग ||४||

४२. करूनि आरती । आता ओवाळू श्रीपती ||१|| आजि पुरले नव्स । धन्य काळ हा दिवस ||२|| पाहा वो सकळां । पुण्यवंता तुम्ही बाळा ||३|| तुका वाहे टाळी । होता सन्निध जवळी ||४||









४३.प्रेम सप्रेम आरती । गोविंदातें ओंवाळिती ||१|| धन्य धन्य तें लोचन । नित्य करिती अवलोकन ||धृ|| बाळा प्रौढा आणि मुग्धा । ओंवाळिती परमानंदा ||३|| नामा म्हणे केशवातें । देखूनि राहिलों तटस्थें ||४||

## श्री विठोबाची आरती

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगी रखुमाई दिसे दिव्य शोभा । पुंडलिकाच्या भेटी परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ||१|| जय देव जय देव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा राहीच्या वल्लभा पावें जिवलगा ||धृ.|| तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं कासे पितांबर कस्तुरी लल्लाटी । देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहाती ||जय.||२|| आषाढीं कार्तिकी भक्तजन येती । चंद्रभागेमध्ये स्नाने जे करिती । दर्शनहेळामात्रे तयां होय मुक्ती । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ||३||



## ।। श्री ज्ञानदेव महाराजांची आरती ।।

आरती ज्ञानराजा । महाकैवल्य तेजा ।
सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ।। धृ. ।।
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ।
अवतार पांडुरंग । नाव ठेविलें ज्ञानी ।।२।।
प्रकट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें ।
रामा जनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ।।३।।

## ।। श्री तुकाराम महाराजांची आरती ।।

आरती तुकारामा । स्वामी सद्‌गुरूधामा ।
सच्चिदानंद मूर्ति । पाय दाखवी आम्हां ।।धृ।।
राघवें सागरांत । पाषाण तारियेले ।
तैसे तुकोबानें । अभंग रचियेले ।।२।।
तुकितां तुलनेसी । ब्रह्म तुकासी आलें ।
म्हणोनि रामेश्वरें । चरणी मस्तक ठेविलें ।।३।।



## || उपसंहार व मागणे ||

घालीन लोटांगण वंदीन चरण । डोळ्यांनी पाहेन रूप तुझे ।।१।। प्रेमें आलिंगीन अनंत पूजीन । भावें ओंवाळीन म्हणे नामा ।।२।।

हेचि व्हावी माझी आस । जन्मोजन्मीं तुझा दास ।।१।। पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदी हरि ।।धृ।। संत संग सर्व काळ । अखंड प्रेमाचा सुकाळ ।।३।। चंद्रभागे स्नान । तुका मागें हेचि दान ।।४।।

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा । माझिया सकळा हरिच्या दासा ।।१।। कल्पनेची बाधा न हो कवणे काळी । ही संतमंडळी सुखी असो ।।धृ।। अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझिया विष्णुदासा भाविकासी ।।३।। नामा म्हणे तयां असावे कल्याण । ज्या मुखी निधान पांडुरंग ।।४।।

मागणे ते एक तुजप्रती आहे । देशी तरी पाहें पांडुरंगा ।।१।। या संतासीं निरवीं हेंचि मज देई । आणिक दुजे कांहीं न मागे तुज ।।धृ।। तुका म्हणे आता उदार तु होई । मजठेवीं पायीं संतांचिया ।।३।।

|| ज्ञानदेव तुकाराम ज्ञानदेव तुकाराम ||



# || श्री पांडुरंगाष्टकम् ||

महायोगपीठे तटे भीमरथ्यां वरं पुण्डरीकाय दातुं मुनींद्रैः ||
समागत्य तिष्ठन्तमानन्दकन्दं परब्रह्मलिङ्गं
भजे पांडुरङ्गम् ||१||

तडिद्वाससं नीलमेघावभासं रमामंदिरं सुन्दरं चित्प्रकाशं । वरंत्विष्टिकायां समन्यस्तपादं
परब्रह्मलिङ्गं भजे पांडुरङ्गम् ||२||

प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां नितम्बःकराभ्यां धृतो येन तस्मात् । विधातुर्वसत्यैः धृतो नाभिकोशः
परब्रह्मलिङ्गं भजे पांडुरङ्गम् ||३||

स्फुरत्कौस्तुभालंकृतं कण्ठदेशे श्रिया जुष्टकेयूरकं श्रीनिवासं । शिवं शान्तमीड्यं वरं लोकपालं
परब्रह्मलिङ्गं भजे पांडुरङ्गम् ||४||

शरच्चद्रबिंबाननं चारुहासं लसत्कुंडलाक्रान्त गंडस्थलाङ्गम् । जपारागबिम्बाधरं कंजनेत्रं
परब्रह्मलिङ्गं भजे पांडुरङ्गम् ||५||









किरिटो ज्जवलत्सर्वदिक्प्रान्तभागं सुरैरर्चितं दिव्य रत्नैरनर्घ्यैः । त्रिभङ्गाकृतिर्बर्हमाल्यावतंसं परब्रह्मलिङ्गं
भजे पांडुरङ्गम् ||६||

विभुं वेणुनादं चरन्तं दुरन्तं स्वयं लीलया गोपवेषं दधानम्।
गवां वृंदकानन्दनं चारुहसं परब्रह्मलिङ्गं भजे
पांडुरङ्गम् ||७||

अजं रुक्मिणिप्राणसंजीवनन्तं परंधाम कैवल्यमेकं तुरीयम्। प्रसन्नं प्रपन्नार्तिहं देवदवं परब्रह्मलिङ्गं भजे
पांडुरङ्गम् ||८||

स्तवं पांडुरंगस्य वै पुण्यदं ये पठन्त्वेकचित्तेन भक्त्याच नित्यम् ।
भवांभोनिधि तेऽपितीर्त्वांऽन्तकाले हरेरालयं शाश्वतं
प्राप्नुवन्ति ||९||

इति श्रीमद् आद्य शंकराचार्यकृत श्री पांडुरंगाष्टकम् संपूर्णम्।

|| इति शुभं भवतु ||



## || पसायदान ||

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हे ।।१।।
जें खळांची व्यंकटी सांडों। तया सत्कर्मीं रती
वाढों। भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचें ।।२।।
दुरीतांचें तिमिर जावों । विश्व स्वधर्मसूर्यें पाहों।
जो जें वांच्छील तो तें लाहों । प्राणिजात ।।३।।
वर्षत सकळमंगळीं। ईश्वरनिष्ठांची मंदियाळी।
अनवरत भूमंडळीं । भेटतू या भूतां ।।४।।
चला कल्पतरूंचे आरव । चेतना चिंतामणींचें
गांव। बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।।५।।
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ।।६।।
किंबहूना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरूखी । अखंडित ।।७।।







आणि ग्रंथोपजीविजे । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्ट विजयें। होआवें जी ।।८।।
तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो। हा होईल दानपसावो।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ।।९।।
।। तथास्तु तथास्तु तथास्तु ।।



## || प्रार्थना ||

ॐ सहनाववतु सहनौ भुनक्तु । सहवीर्यं करवावहै ।
तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ।।
सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चितदुःखमाप्नुयात् ।।
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

